राज्याच्या कृषी पर्यटन धोरणास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०१९/८/प्र.क्र.५१४/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २८ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना :-**

शासनाने दि.०४.०५.२०१६ च्या शासन निर्णयानुसार नवे पर्यटन धोरण जाहीर केले असून, या धोरणाअंतर्गत पर्यटन क्षेत्रामध्ये वार्षिक १० टक्के उत्पन्न आणि राज्याच्या सकल उत्पन्नात पर्यटन क्षेत्राचा १५ टक्के वाटा प्राप्त करण्याचे तसेच या क्षेत्रात सन २०२५ पर्यंत १ दशलक्ष रोजगार निर्मिती करण्याचे लक्ष्य ठेवले आहे. हे उद्दिष्ट गाठण्यासाठी या धोरणांतर्गत ग्रामीण पर्यटन, कृषी पर्यटन राबविण्याची संकल्पना समाविष्ट करण्यात आली आहे. यास अनुसरुन राज्याचे कृषी पर्यटन धोरण जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सुमारे ५५ ते ६० टक्के लोक प्रत्यक्षपणे शेतीवर अवलंबून आहेत. ग्रामीण भागातील शेतकऱ्यांच्या विकासासाठी फलोत्पादन, दुग्धव्यवसाय, शेळी व मेंढी पालन, कुक्कुट पालन, रेशीम उद्योग, मधुमक्षिकापालन, मत्स्यव्यवसाय इ. कृषी संलग्न विषयाचा एकत्रित विचार केल्यास, ग्रामीण भागामध्ये कृषी पर्यटनाला निश्चितपणे चालना मिळू शकते. राज्यातील शेतकऱ्यांना पुरक व्यवसाय उपलब्ध करुन देणे आणि शहरी पर्यटकांना शांत, निसर्गसंपन्न ठिकाणी राहून पर्यटनाचा आनंद मिळावा यासाठी एक सुनियोजीत व्यवस्था निर्माण करुन पर्यटन विकास साध्य करण्यासाठी मा. मंत्रीमंडळाच्या दि.६/९/२०२० रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार राज्यात खालीलप्रमाणे **"कृषि पर्यटन धोरण"** राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१. कृषी पर्यटनाचा उद्देश :**

१) कृषी पर्यटनातून ग्रामीण विकास आणि ग्रामीण विकासातून राज्याचा विकास साधणे.
२) कृषी पर्यटनाच्या माध्यमातून शेती उत्पादनांना बाजारपेठ उपलब्ध करुन देणे.
३) कृषी पर्यटनाला कृषी पूरक व्यवसाय म्हणून प्रोत्साहन देणे.
४) ग्रामीण भागातील लोककला आणि परंपरा यांचे दर्शन घडविणे.
५) ग्रामीण महिला व तरुणांना गावातच रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे.
६) शहरी भागातील लोकांना/विद्यार्थ्यांना शेती आणि शेती पध्दती तसेच कृषी संलग्न व्यवसायांची माहिती उपलब्ध करुन देणे.
७) कृषी पर्यटनाच्या माध्यमातून ग्रामीण भागातील राहणीमान उंचावणे.
८) पर्यटकांना प्रदुषणमुक्त, शांत व निसर्गाच्या सान्निध्यात राहण्याचा अनुभव देणे.

९) पर्यटकांना प्रत्यक्ष शेतातील कामाचा अनुभव देणे.

१०) शेतावरील कृषी मालाच्या प्राथमिक प्रक्रियेस प्रोत्साहन देणे.

११) ग्रामीण भागातील पडीक, गायरान आणि क्षारपड जमिनी उपयोगात आणणे.

**३. <u>कृषी पर्यटन केंद्राकरिता पात्र घटक</u> :**

१) वैयक्तिक शेतकरी
२) शेतकऱ्यांच्या कृषी सहकारी संस्था
३) शासन मान्यता प्राप्त कृषी विज्ञान केंद्र
४) कृषी महाविद्यालये (खाजगी व शासकीय)
५) कृषी विद्यापीठे
६) शेतक-यांनी स्थापन केलेली भागीदारी संस्था किंवा कंपनी

**४. <u>कृषी पर्यटनासाठी बंधनकारक बाबी</u> :-**

i. कृषी पर्यटन केंद्र चालविताना शेती हा प्रमुख व्यवसाय, तर पर्यटन हा पुरक व्यवसाय असावा.
ii. **<u>खेडेगाव</u> :** कृषी पर्यटन केंद्र हे शहराच्या (महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषद, नगरपंचायत) हद्दीपासून किमान १ कि.मी. बाहेर आणि शक्यतो खेडेगावामध्ये असावे.
iii. **<u>शेती क्षेत्र</u>** : कृषी पर्यटन शेती आणि शेती संलग्न बाबींवरच आधारित असल्यामुळे कृषी पर्यटन सुरु करण्यासाठी कमीतकमी १ एकर किंवा त्यापेक्षा जास्त शेती क्षेत्र असावे. ज्या कृषी पर्यटन केंद्रात शालेय सहली आयोजित करण्यात येणार आहेत, त्या कृषी पर्यटन केंद्राचे क्षेत्र कमीत कमी ५ एकर असावे.
iv. सदर ठिकाणी २४ तास पाणी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी केंद्र चालकाची राहील.
v. **<u>शेतकरी</u>** : पर्यटन केंद्र चालविणारी व्यक्ती ही वैयक्तिक शेतकरी असल्यास तो / ती स्वत: ती शेती कसणारा असावा, तसेच सदर शेती त्याच्या स्वत:च्या अथवा त्याच्या कुटुंबातील सदस्याच्या नावे असणे आवश्यक आहे. म्हणजे ७/१२ उतारा कुटुंबाच्या नावे असणे आवश्यक आहे.
vi. कृषी पर्यटन केंद्राअंतर्गत राहण्याकरीता उभारण्यात येणाऱ्या खोल्या शक्यतो पर्यावरणपुरक असाव्यात. उदा. लाकूड, बांबू, जांभा दगड, झोपडी वजा इ. बांधकाम असावे व त्यात सक्षम प्राधिकाऱ्याची परवानगी आवश्यक आहे.
vii. कृषी पर्यटन केंद्र चालकामार्फत भोजनाची व्यवस्था, स्वच्छ पिण्याचे पाणी, शौचालय, इ.सोयी-सुविधा पर्यटकांना उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.
viii. पर्यटन धोरणात नमूद केल्याप्रमाणे इयत्ता पाचवी ते दहावी पर्यंतच्या विद्यार्थ्यांसाठी अशा केंद्रांना किमान एक शैक्षणीक सहल/भेट आयोजीत करण्यात यावी.

**५. <u>आदर्श पर्यटन केंद्राकरीता इतर अनुषंगिक बाबी (ऐच्छिक बाबी):-</u>**

१) पर्यटन केंद्र हे शांत, सुंदर, निसर्गरम्य अशा ठिकाणी असावे.

२) पर्यटन केंद्राच्या ठिकाणी एकाचवेळी विविध पीक पध्दतींचा अवलंब केला गेला असावा. जेणेकरुन पर्यटकांना शेतीतील विविधतेचा अनुभव घेता येईल. उदा. अन्नधान्य, भाजीपाला, फळबागा, फुलशेती, रोपवाटीका इ.

३) पर्यटन केंद्रावर घरगुती पध्दतीच्या, रुचकर, शक्यतो महाराष्ट्रीयन भोजनाची व्यवस्था असावी.

४) ग्रामीण जीवनाचा अनुभव देण्यासाठी बैलगाडी, घोडागाडी, घोडेस्वारी, शेतीवरील विविध हंगामातील कामे दाखविण्याची सोय असावी.

५) पर्यटन केंद्रावर ग्रामीण खेळ. उदा. विटीदांडू, हुतूतू, लंगडी, झोका, लगोरी इ. खेळण्याची सुविधा असावी.

६) पर्यटन केंद्रावर ग्रामीण व पारंपारिक मनोरंजन कार्यक्रमाची व्यवस्था असावी. उदा.पोवाडा, गोंधळ जागरण, गजेनृत्य, लेझिम, भजन-किर्तन, आदिवासी नृत्य इ.

७) पर्‍यटन केंद्राच्या परिसरात किल्ला, गिर्यारोहण, तलाव, नदी इ. निसर्गरम्य ठिकाण असल्यास त्याबाबत केंद्रचालकाने पर्यटकांना मार्गदर्शन करावे.

८) नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्राने दरवर्षी १६ मे हा “कृषी पर्यटन दिन” म्हणून साजरा करावा.

९) कृषी पर्यटन केंद्राने शेतीमधील ताजा भाजीपाला, फळे, अन्नधान्य इ. माल पर्यटकांच्या विक्रीसाठी उपलब्ध करुन द्यावा.

१०) नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्रामार्फत दिशादर्शक फलक लावणे आवश्यक आहे.

११) कृषी पर्यटनाचा उत्तम दर्जा टिकून राहण्यासाठी प्रतिवर्षी कृषी पर्यटन केंद्रांची पर्यटन संचालनालया मार्फत तपासणी केली जाईल.

१२) कृषी पर्यटन केंद्रे प्लॅस्टिकमुक्त विभाग म्हणून ओळखली जातील.

१३) कृषी क्षेत्र कमी आकाराचे असल्यास आसपासच्या शेतकऱ्यांच्या जमीनीवरील कृषी संबंधित बाबी संबंधित शेतकऱ्याच्या सहमतीने पर्यटकांना दाखविता येतील.

१४) सेंद्रीय शेती संदर्भात पर्यटकांना प्राधान्याने माहिती देण्यात यावी.

१५) पर्यटन केंद्राच्या ठिकाणी स्थानिक कला, संस्कृती दाखविण्यासाठी साहित्य उपलब्ध करुन द्यावे.

१६) पर्यटन केंद्रांनी पाणी बचतीचे नियोजन करावे उदा. ठिबक सिंचन, तुषार सिंचन.

१७) वीजेकरिता सौरऊर्जा, पवनचक्की यांना प्राधान्य द्यावे.

१८) राज्याबाहेरील व विदेशी पर्यटक येत असल्यास केंद्र चालकास हिंदी / इंग्लिश भाषेचे ज्ञान असावे.

१९) कृषी पर्यटन केंद्रचालक पर्यटकांना ग्रामीण समाजव्यवस्थेचा अनुभव देतील. उदा.बलुतेदार, अलुतेदार, वासुदेव, डोंबारी, बहुरूपी, इ.

६. **कृषी पर्यटन केंद्रामार्फत पर्यटकांना पुरविण्यात येणाऱ्या सेवा** :-

शेतीसोबत खालीलपैकी एक किंवा अनेक किंवा सर्व सेवा कृषी पर्यटन केंद्र चालकांनी पर्यटकांना उपलब्ध करुन द्याव्यात.

अ) एक दिवसीय सहल (डे ट्रिप)

आ) निवास व्यवस्था

इ) मनोरंजनात्मक सेवा (उदा.लहान मुलांना खेळण्यासाठी जागा, साहसी खेळ, ग्रामीण खेळ,इ.)

ई) कृषी कॅंपिंग (तंबु निवारा)

उ) फळबागा व पदार्थ विक्री केंद्र (Product Sale) (उदा.संत्री / संत्र्याचा ज्युस, द्राक्षे / वाईन, स्ट्रॉबेरी / स्ट्रॉबेरीपासून बनविलेले पदार्थ इ.)

(अ) **निवास व्यवस्था:** कृषी पर्यटन केंद्राच्या ठिकाणी पर्यटकांना निवास व्यवस्था उपलब्ध करुन देणाऱ्या कृषी पर्यटन केंद्राकरिता खालील तक्त्यातील बाबी लागू राहतील.

| अ.क्र. | शेतीचे क्षेत्र | खोल्यांची संख्या | खोल्यांचे आकारमान |
|---|---|---|---|
| १ | ०२ एकर पर्यंत | ०४ (कमाल) | १५० चौ.मी. किमान |
| २ | ०२ एकर पेक्षा जास्त व ०५ एकर पर्यंत | ०६ (कमाल) | १५० चौ.मी. किमान |
| ३ | ०५ एकर व त्यापेक्षा जास्त | ०८ खोल्या व शौचालयाची स्वतंत्र व्यवस्था असलेले २ लोकनिवास (२५ गाद्या प्रत्येकी) | खोलीचे किमान आकारमान -१५० चौ.मी. लोकनिवासाचे किमान आकारमान- ७००-८०० चौ.फू. |

- प्रत्येक खोलीस जोडलेले शौचालय, बाथरुम आवश्यक राहील. सदर पर्यटक निवासस्थानाचे बांधकाम हे शक्यतो पर्यावरणपूरक असावे व त्यास सक्षम प्राधिकाऱ्याची परवानगी आवश्यक आहे.
- शालेय सहलींसाठी अथवा मोठया समूहासाठी २५ बेडची क्षमता असलेले जास्तीत जास्त दोन लोकनिवास (Dormitary) बांधता येतील. परंतू त्याकरीता किमान ५ एकर क्षेत्र असणे बंधनकारक राहील.
- पर्यटन धोरण-२०१६ प्रमाणे आठ खोल्यांपर्यंतच्या केंद्रांसाठी खोल्या आणि सुविधांच्या बांधकामासाठी नगर रचना विभागाच्या परवानगीची आवश्यकता असणार नाही. आठपेक्षा जास्त खोल्या असलेली केंद्रे व्यावसायिक उपक्रम म्हणून ओळखली जातील आणि त्यासाठी नगर रचना विभागाची परवानगी आवश्यक असेल.

**(ब)** **भोजन व्यवस्था व स्वयंपाकघर** : (सर्व प्रकारच्या सेवांकरिता बंधनकारक)

नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्र चालकाने पर्यटकांना भोजनाची व्यवस्था उपलब्ध करुन द्यावी. त्यासाठी किमान १५'x१०' आकाराचे स्वयंपाकघर असावे.

(क) कृषी पर्यटन केंद्र चालविण्यासाठी पर्यटन विभागाचे नोंदणी प्रमाणपत्र घेणे तसेच आवश्यक त्या इतर सर्व विभागांच्या परवानग्या घेणे बंधनकारक राहील.

**(ड)** तात्काळ वैद्यकीय सेवा उपलब्ध होण्यासाठी फर्स्ट एड बॉक्स (First Aid Box) पर्यटन केंद्राच्या ठिकाणी ठेवण्यात यावा.

**(ई)** अग्नीशामक यंत्र बसविणे आवश्यक राहील.

**(फ)** जागतीक साथरोगासंदर्भात (उदा. कोविड-१९) सुरक्षिततेच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे आवश्यक राहील.

(ग) कृषी पर्यटन केंद्राच्या ठिकाणी जाण्यासाठी सुस्थितीतील पोहोच रस्ता (approach road) तसेच पर्यटकांच्या वाहनासाठी वाहनतळाची व्यवस्था असणे आवश्यक आहे.

७. **कृषी पर्यटनाअंतर्गत शेतीसोबत खालीलपैकी सर्व किंवा काही उपक्रम राबविता येतील** :-

१) हरितगृह
२) दुग्धव्यवसाय
३) मत्स्य व्यवसाय (मत्स्यशेती, मत्स्य तळे)
४) रोपवाटिका (नर्सरी), फळबागा.
५) पशु-पक्षी पालन (कुक्कुटपालन, शेळीपालन, मेंढी पालन इ.)
६) निसर्ग साहसी पर्यटन - याकरिता स्वतंत्र परवानगी घ्यावी लागेल.
७) वाईन टुरिझम.

८. **कृषी पर्यटन केंद्रास शासनाकडून मिळणारे लाभ :-**

१) कृषी पर्यटन केंद्रास पर्यटन विभागाकडून नोंदणी प्रमाणपत्र मिळेल.
२) कृषी पर्यटन केंद्र मालकास नोंदणी प्रमाणपत्राच्या आधारे बँक कर्ज प्राप्त करता येऊ शकेल.
३) नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्रास पर्यटन धोरण - २०१६ मधील प्रोत्साहनांचा उदा. वस्तु व सेवा कर, विद्युत शुल्क (मुद्रांक शुल्क सवलत वगळता) इ.चा लाभ घेता येईल.
४) जलसंधारण विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या शेततळे योजनेकरिता कृषी पर्यटन केंद्रास प्राधान्य देण्यात येईल.
५) नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्रास राज्य व केंद्र शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या ग्रीन हाऊस, फळबाग, भाजीपाला लागवड यासारख्या योजनांचे फायदे घेता येतील.
६) कृषी पर्यटन धोरणांतर्गत ज्या ठिकाणी घरगुती स्वयंपाकगृह वापरले जाईल त्या ठिकाणी सदर केंद्रांना निवास व न्याहारी योजनेच्या धर्तीवर घरगुती गॅस जोडणी वापरता येईल.

७) कृषी पर्यटन केंद्रास वीज आकारणी घरगुती दराप्रमाणे आकारण्याबाबत विचार करण्यात येईल.

८) <u>**प्रशिक्षण व मार्गदर्शन**</u>-:

कृषी पर्यटन केंद्र चालकांना अनुभवी प्रशिक्षकामार्फत खालील बाबींचे प्रशिक्षण देण्यात येईल.

- अन्न सुरक्षा, स्वच्छतेबाबत प्रशिक्षण
- आदरातिथ्य
- प्रसिद्धी व विपणन
- आदर्श अनुभवाधारित पर्यटन
- आदर्श शेती कार्यपद्धती (Best Agriculture Practices)
- आदर्श कृषी पर्यटन केंद्रास स्थळ भेट

९) <u>**प्रसिद्धी**</u> - या धोरणांतर्गत नमुद ऐच्छिक बाबी योग्य व चांगल्या प्रकारे दाखवून पर्यटकांना अनुभव समृद्ध पर्यटनाचा लाभ देत असणाऱ्या कृषी पर्यटन केंद्रांनी त्याबाबतचे फोटो, व्हिडिओ पर्यटन संचालनालयास उपलब्ध करुन दिल्यास त्याची प्रसिद्धी विविध माध्यमांतून करण्यात येईल. तसेच नोंदणीकृत कृषी पर्यटन केंद्रांची पर्यटन विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिद्धी केली जाईल. कृषी पर्यटन केंद्रांच्या संकेतस्थळांची लिंक पर्यटन विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०) <u>**विपणन व्यवस्था**</u> - खाजगी / शासकीय विपणन व्यवस्थांचा तसेच ऑनलाईन मार्केटिंग चा पर्याय पर्यटन विभागाकडून उपलब्ध करुन दिला जाईल.

११) पर्यटन धोरण-२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे आठ खोल्यांपर्यंतच्या केंद्रांसाठी खोल्या आणि सुविधांच्या बांधकामासाठी नगर रचना विभागाच्या परवानगीची आवश्यकता असणार नाही.

९. <u>**अर्ज करण्याची कार्यपद्धती:**</u>

पर्यटन संचालनालयामार्फत www.maharashtratourism.gov.in या संकेतस्थळावर तसेच प्रादेशिक उपसंचालक, पर्यटन संचालनालय कार्यालयात अर्ज उपलब्ध करुन देण्यात येतील व त्यासाठी खालीलप्रमाणे कागदपत्रे आवश्यक असतील.

१) अर्जदाराची जमिनीची कागदपत्रे (७/१२ उतारे, ८अ)

२) वैयक्तिक शेतकरी वगळता इतरांकरिता विविध कायद्यांतर्गत नोंदणी प्रमाणपत्र. (सहकार कायदा, कंपनी कायदा,भागीदारी संस्था,इ.)

३) विविध कायद्यांतर्गत नोंदणी झालेल्या संस्थांनी कृषी पर्यटन केंद्राकरिता अर्ज करण्यास प्राधिकार पत्र.

४) आधार कार्ड / पॅन कार्ड.

५) वीज बील

६) नोंदणी शुल्क ऑनलाईन पद्धतीने www.gras.mahakosh.gov.in या वेबसाईटवर भरुन त्या चलनाची प्रत
७) अन्न सुरक्षा कायद्यांतर्गत परवाना (Food License)
८) लोकनिवास (Dormitory) असल्यास बांधकाम परवानगीचे प्रमाणपत्र

**१०. नोंदणी प्रमाणपत्र कार्यपद्धती :**

१) ऑनलाईन अर्ज प्राप्त झाल्यानंतर छाननी केली जाईल.
२) उपसंचालक, पर्यटन अथवा त्यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी कृषी विभागाच्या प्रतिनिधी समवेत स्थळ पाहणी करतील.
३) उपसंचालक, पर्यटन यांच्यामार्फत नोंदणी प्रमाणपत्र निर्गमित करण्यात येईल.
४) धोरणांतर्गत बाबींची पुर्तता होत नसल्यास नोंदणी नाकारण्याचा अधिकार उपसंचालक, पर्यटन यांना राहील.
५) उपसंचालक, पर्यटन यांच्यामार्फत वेळोवेळी केलेल्या तपासणीत कृषी पर्यटन धोरणाच्या विरुध्द गंभीर बाबी निदर्शनास आल्यास नोंदणी प्रमाणपत्र निलंबित करणे / रद्द करण्याचा अधिकार उपसंचालक, पर्यटन यांना राहील.
६) नोंदणी प्रमाणपत्र ही सेवा लोकसेवा हक्क अधिनियमान्वये अधिसुचित करण्यात येईल.

**११. नोंदणी शुल्क** - कृषी पर्यटनाकरीता प्रथम नोंदणी करीता रु.२,५००/- शुल्क असेल. दर पाच वर्षांनी रु.१,०००/- एवढे नुतनीकरण शुल्क भरुन नोंदणीचे नुतनीकरण करता येईल.

१२. **अपील :-**

**प्रथम अपील :-** उपसंचालक, पर्यटन संचालनालय यांच्यामार्फत देण्यात आलेल्या निर्णयाविरुद्ध संचालक, पर्यटन संचालनालय यांच्याकडे प्रथम अपील **१५** दिवसांच्या आत करता येईल.

**(ब) द्वितीय अपील :-** संचालक पर्यटन संचालनालय यांनी दिलेल्या निर्णयाविरुद्ध **३०** दिवसांच्या आत सचिव/प्रधान सचिव (पर्यटन) यांच्याकडे द्वितीय अपील करता येईल व त्यांनी दिलेला निर्णय अंतिम राहील.

**१३. राज्यस्तरीय महाराष्ट्र कृषी पर्यटन विकास समिती :-**

राज्यातील कृषी पर्यटनाला चालना देण्यासाठी प्रचार, प्रसिध्दीकरीता व अडीअडचणी सोडविण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय महाराष्ट्र कृषी पर्यटन व ग्रामिण पर्यटन विकास समिती असेल.

| | |
|---|---|
| १. प्रधान सचिव (पर्यटन) | अध्यक्ष |
| २. आयुक्त (कृषी) | सदस्य |
| ३. संचालक (पर्यटन संचालनालय) | सदस्य |
| ४. सह सचिव (ग्रामविकास विभाग) | सदस्य |
| ५. सह सचिव (जलसंधारण) | सदस्य |

| | |
|---|---|
| ६. कृषी पर्यटन क्षेत्रातील ०२ तज्ञ | सदस्य |
| ७. उपसचिव (पर्यटन) | सदस्य सचिव |

**समितीची कार्ये:-**

- कृषी पर्यटन धोरणाचा वेळोवेळी आढावा घेणे.
- कृषी पर्यटन धोरणात सुयोग्य बदल सुचविणे.
- कृषी पर्यटन धोरणासंबंधित केंद्र व राज्य शासनाच्या विविध विभागांशी समन्वय.
- कृषी पर्यटनाबाबत संशोधन व विकास.
- कृषी पर्यटन केंद्राना सक्षम बनविण्यासाठी अर्थ सहाय्याचे विविध पर्याय सुचविणे.
- कृषी विद्यापीठे, कृषी महाविद्यालय यांच्यामार्फत आदर्श कृषी पर्यटन केंद्र निर्मिती.
- कृषी पर्यटन केंद्रांकरिता कौशल्य विकासाची योजना तयार करणे.
- कृषी पर्यटनासाठी विभागीय तसेच राज्यस्तरांवर काम करणाऱ्या संघटनांमध्ये समन्वय साधणे व त्यांना प्रोत्साहन देणे.
- राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय स्तरावरील कृषी पर्यटनासंदर्भातील यशस्वी उपक्रम महाराष्ट्रात राबविण्यासाठी प्रयत्न करणे.
- राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय स्तरावर राज्यातील कृषी पर्यटन केंद्राची व्यापक प्रसिद्धी करुन परदेशी पर्यटकांना आकर्षित करणे.
- राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय स्तरावरील कृषी पर्यटनासंबंधित प्रदर्शने, परिषदा (Exhibition, Conferences) मध्ये सहभागी होऊन महाराष्ट्रातील कृषी पर्यटनास राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय पातळीवर नेणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९२८१७१२३५४१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d23 2bb3a3fcc8,
serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300 ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2020.09.29 16:12:05 +05'30'

**(र. ज. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३.मा. मंत्री(पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४.मा. राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
५.मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
६.मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

७.मा. विरोधी पक्षनेता विधानसभा, विधानभवन, मुंबई.

८. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.

९.मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.

१०.मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

११.अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

१३.महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर

१४.महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.

१५.संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.

१७.निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

****